श्री रणधीर सोमवंशी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन आदेश क्रमांकः आस्था-०५२१/प्र.क्र.५३/पापु-०७**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, क्रॉफर्ड मार्केट जवळ, नविन मंत्रालय इमारत, मुंबई ४०० ००१.
तारीख: २९ डिसेंबर, २०२१

**वाचा: १)** मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.आस्था-१०२०/प्र क्र ६२/पापु-२५, दिनांक ०९/०२/२०२१.
**२)** ग्राम विकास विभाग, पत्र क्रमांकः मविसे-१०२१/प्र.क्र.१३७/२०२१/आस्था-३, दिनांक २६/११/२०२१.

**शासन आदेश :**

श्री. रणधीर सोमवंशी, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड यांची पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिपत्याखालील मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर ,नवी मुंबई या कार्यालयातील "प्रकल्प संचालक (स्वच्छ भारत मिशन (ग्रा.))" या पदावर प्रथमत: ३ वर्षांसाठी खालील अटी व शर्थींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

१) श्री. रणधीर सोमवंशी, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड हे ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजु होतील त्या तारखेपासून त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ज्या तारखेला ते आपल्या मूळ शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारतील त्या तारखेला त्यांची प्रतिनियुक्तीवरील सेवा समाप्त होईल.
२) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापुर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावण्याचा अधिकार शासन/ सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.
३) जर त्यांची प्रतिनियुक्तीवरिल सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे.
४) श्री. रणधीर सोमवंशी, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत जाण्याची मुभा राहील.

५) ग्राम विकास विभागाने वाचा येथील अ.क्र.२ येथील दिनांक २६/११/२०२१ च्या पत्रान्वये श्री. सोमवंशी यांना प्रकल्प संचालक "प्रकल्प संचालक (स्वच्छ भारत मिशन (ग्रा.))" या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्यास सहमती दर्शविली असल्याने श्री. सोमवंशी यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर रजू होण्याकरीता ग्राम विकास विभागाने त्वरित कार्यमुक्त करावे.

६) मिशन संचालक, जल जीवन मिशन, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई यांनी श्री. रणधीर सोमवंशी, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड) यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर पदस्थापनेच्या ठिकाणी रुजु करुन घ्यावे व रुजु अहवाल पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास तसेच ग्राम विकास विभागास पाठवावा.

महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा........इ.) नियम, १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) मधील तरतूदीनुसार मिशन संचालक, जल जीवन मिशन, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर व ग्राम विकास विभाग यांनी श्री. रणधीर सोमवंशी, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्थी आपआपसात ठरवाव्यात.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२८१७१६४५४७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJESH SHALIGRAM GOVIL

Digitally signed by RAJESH SHALIGRAM GOVIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, pseudonym=33A179E7AD16D30003C36A2A8ECB842B36CA1804, serialNumber=0ED8916DB8E68105B4125438A1606D0F12978EECB0C9464E868A33D64327201B, cn=RAJESH SHALIGRAM GOVIL
Date: 2021.12.29 13:43:11 +05'30'

( राजेश गोविल)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

श्री. रणधीर सोमवंशी, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड

**प्रत :**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.
५. मिशन संचालक (जल जीवन मिशन), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड

७. सह सचिव (पापु-०७/१०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, मुंबई.
८. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई.
१०. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व नियंत्रन अधिकारी/ पर्यवेक्षीय अधिकारी.
११. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.
१२. निवडनस्ती (कार्यासन पापु-०७).